राज्यात औद्योगिक पायाभूत सुविधांची निर्मिती
व विकासासंदर्भात निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.
वित्तिय वर्ष २०१६-२०१७ करीता.
(वाडा जि.पालघर येथील रस्ते)

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन ज्ञापन क्र.औपासु-२०१६/प्र.क्र. १९१/उद्योग-२,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,
दिनांक : २७ ऑक्टोबर, २०१६.

**संदर्भ :-** १) उ,ऊ व का विभाग, शासन निर्णय क्र. आयआयआय-पॉलीसी- २०१०/प्र.क्र.७६८/उद्योग २, दिनांक २२.२.२०१३
२) उ,ऊ व का विभाग, शासन निर्णय क्र. औपासु-२०१२/प्र.क्र.२३४/उद्योग-२, दिनांक २५ फेब्रुवारी,२०१४
३) मुख्य अभियंता, मुंबई (सा.बां.) प्रादेशिक विभाग, मुंबई यांचा क्र.मुअ(मु) /का-१(१)/४६६, दि.७.११.१४ रोजीचा प्रस्ताव.
४) उद्योग संचालनालयाचे क्र.उसं/साप्रोयो/मऔधे/अंपवाडा/२०१४/अे-१३२५, दि.१०.११.१४ रोजीचा प्रस्ताव.
५) दिनांक १९.१२.२०१४ रोजी झालेल्या सुकाणू समितीच्या दुसऱ्या बैठकीचे इतिवृत्त दि.६ जानेवारी,२०१५
६) उद्योग ,ऊर्जा व कामगार विभाग शासन ज्ञापन क्र. मऔधो-२०१५/प्र.क्र.८८/उद्योग-२, दिनांक २३ जुलै,२०१५
७) उद्योग ,ऊर्जा व कामगार विभाग शासन ज्ञापन क्र. औपासु-२०१५/ प्र.क्र.३९/ उद्योग-२, दिनांक २८ मार्च, २०१६.

**शासन निर्णय :**

राज्यात औद्योगिक पायाभूत सुविधांची निर्मिती व विकास या योजनेअंतर्गत मा.मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील “महाराष्ट्र औद्योगिक पायाभूत सुविधा विकास समिती” च्या दिनांक १९.१२.२०१४ रोजी झालेल्या बैठकीत दिलेली मान्यता व संदर्भ क्र.६ अन्वये दिलेली प्रशासकीय मान्यता विचारात घेऊन, निधीच्या उपलब्धतेनुसार खाली नमूद केलेल्या ४ प्रस्तावांना एकूण रु.१५,००,००,०००/- ( अक्षरी रुपये पंधरा कोटी फक्त) इतकी रक्कम विकास आयुक्त (उद्योग) यांनी आहरण करुन सार्वजनिक बांधकाम विभाग या कार्यान्वयन यंत्रणेकडे सुपूर्द करण्यास, पुढील अटींच्या अधिन राहून शासन याव्दारे मान्यता देत आहे.

| **अ.क्र** | **कामाचे नांव** | **सुकाणू समितीने मान्यता दिल्यानुसार औ. पा. सु. नि. व वि. निधीतून द्यावयाची रक्कम** | **सन २०१५-१६ साठी वितरीत करण्यात आलेली रक्कम** | **सन २०१६-१७ साठी वितरीत करण्यात येत असलेली रक्कम** |
|---|---|---|---|---|
| १ | कुडूस ते कोंडले ५ कि.मी. रस्त्याची सुधारणा करणे. | रु. १५.२५ कोटी | रु. ५.०० कोटी | रु. २.०० कोटी. |
| २ | सापरोंडे ते उचाट रस्ता २ कि.मी. रस्त्याची सुधारणा करणे. | रु. ४.०३ कोटी | रु. १.३० कोटी | रु. १.०० कोटी. |
| ३ | कुडुस ते भावघर कंचाड ७ कि.मी. रस्त्याची सुधारणा करणे. | रु. २१.६५ कोटी | रु. ६.०० कोटी | रु. ७.०० कोटी. |
| ४ | शिरिषपाडा-कोन-असंबीटघर आघाई ८.५ कि.मी. रस्त्यांची सुधारणा करणे | रु. २३.७६ कोटी | रु. ६.९० कोटी | रु.५.०० कोटी. |
| | **एकूण** | **रु. ६३.७० कोटी** | **रु. १९.२० कोटी** | **रु.१५.०० कोटी.** |

**अटी:-**

I) सदर प्रकल्पांचे नकाशे व अंदाजपत्रकास सार्वजनिक बांधकाम विभागाने तपासणी करुन देण्यात आलेल्या तांत्रिक मान्यतेच्या अधिन राहील.

II) पूर्व पृष्ठावर नमूद केलेल्या खर्चाचे काम पूर्ण होईपर्यंत झालेल्या प्रकल्पाच्या खर्चातील वाढ ( Cost Escalation ) सार्वजनिक बांधकाम विभागाने स्वत:च्या निधीतून उपलब्ध करुन कामे पूर्ण करणे आवश्यक राहील.

III) शासनाकडून पायाभूत सेवांसाठी निधी उपलब्ध करुन देण्यात येत असल्याने प्रस्तुत शासननिर्णयात नमुद प्रकल्पांवरील देखभाल दुरुस्ती सार्वजनिक बांधकाम विभागाने स्वत:च्या निधीतून करावा. तसेच प्रस्तुत रस्त्यांवर टोलची आकारणी करु नये. याबाबत सार्वजनिक बांधकाम विभागाने उद्योग संचालनालयाशी करारनामा करावा.

IV) पूर्व पृष्ठावर नमूद प्रकल्पांवर अन्य कोणताही विभाग अथवा संस्थांकडून खर्च झालेला नाही याची खातरजमा कार्यान्वयन यंत्रणेने (सार्वजनिक बांधकाम विभागाने) करुन घ्यावी.

V) शासनाने उपलब्ध करुन दिलेल्या निधी विहीत प्रयोजनार्थ त्याच रस्त्यावर वापरावा यामध्ये कोणताही बदल सा.बा.वि.ने परस्पर करु नये.

VI) शासन निर्णय क्र.औपासू-२०१२/प्र.क्र.२३४/उद्योग-२, दिनांक २५.२.२०१४ मधील कार्यपध्दती व मार्गदर्शक तत्वांचे पालन आहरण व संविरण अधिकारी व कार्यान्वयन यंत्रणा यांनी कराव्यात.

VII) कार्यान्वयन यंत्रणांना उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी संदर्भात प्रकल्पनिहाय उपयोगिता प्रमाणपत्र व कामाचा पूर्तता अहवाल अधिक्षक अभियंता (सा.बा.वि) यांनी विकास आयुक्त (उद्योग) मार्फत शासनास सादर करावा.

VIII) विकास आयुक्त (उद्योग) यांनी ३१.०३.२०१७ पर्यंत खर्च होणारा निधी कोषागरेमधून काढावा व जास्तीचा निधी कोषागरेमधून काढून अन्य संस्थांकडे जमा करु नये.

२. ही शासन मान्यता संदर्भीय क्र.५ येथे नमूद केलेल्या सुकाणू समितीच्या दिनांक १९.१२.२०१४ रोजी झालेल्या बैठकीमध्ये प्राप्त मंजूरी व सदरहू बैठकीतील सूचनांनुसार अवलंबवायच्या कार्यपध्दती तसेच उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र.औपासू-२०१२/प्र.क्र.२३४/उद्योग-२, दिनांक २५.२.२०१४ मधील तरतूदीच्या अधीन राहील. कार्यान्वयन यंत्रणेने व आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदर तरतूदीप्रमाणे कार्यवाही करावी.

३. सदर कामासाठी येणारा खर्च लेखाशीर्ष क्र.के-१०, मुख्य लेखाशीर्ष, “४८७५, इतर उद्योगावरील भांडवली खर्च” उपलेखाशीर्ष ६०-इतर उद्योग, ८०० इतर खर्च,८०० (००) (०१), “औद्योगिक पायाभूत सुविधांचा विकास व निर्मिती” (योजनांतर्गत) (४८७५-००२५) या योजनेखाली वित्तिय वर्ष २०१६-१७ करिता मंजूर असलेल्या निधीमधून भागविण्यात यावा.

४. सदर प्रकल्पांची सुरुवात सन २०१५-१६ या आर्थिक वर्षापासून करण्यात आली असून सदर प्रयोजनासाठी संदर्भाधीन क्र. ७ येथील ज्ञापनान्वये सन २०१५-१६ रुपये १९.२० कोटी इतका निधी यापूर्वी वितरीत करण्यात आला होता. या संपूर्ण निधीचे विनियोग झाल्याने अधिक्षक अभियंता (सा.बा.वि.) ठाणे, मंडळ ठाणे यांनी जा.क्र.ठाम/अर्थ/५७९२, दि.१४/१०/२०१६ च्या पत्रान्वये शासनास कळविले आहे व याबाबतचे विनियोग प्रमाणपत्र देखील सादर केले आहे.

५. प्रस्तुत शासन निर्णया मध्ये नमूद केलेल्या प्रस्तावांना एकूण रु.१५,००,००,०००/- ( रुपये पंधरा कोटी फक्त) एवढ्या रकमेच्या आहरणाचे आणि सार्वजनिक बांधकाम विभागाला वितरित करण्याचे अधिकार विकास आयुक्त(उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांचे कार्यालयातील लेखाधिकारी यांना देण्यात येत आहेत.

६. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई यांना कळविण्यात येते की, सदर रकमांचे धनादेश,“कार्यकारी अभियंता, जव्हार, सार्वजनिक बांधकाम विभाग, जव्हार,” यांचे नांवे काढून त्यांना अदा करण्यात यावे.

७. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेल्या रकमेचे उपयोगिता प्रमाणपत्र सार्वजनिक बांधकाम विभाग यांजकडून प्राप्त करुन, विकास आयुक्त(उद्योग) यांनी शासनास सादर करावे.

८. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक २० एप्रिल,२०१६ व त्या सोबतचे परिशिष्ट नुसार असे प्रमाणित करण्यात येते की, प्रस्तुत प्रकल्पाच्या खर्चाच्या बाबीस संदर्भ क्र.६ अन्वये प्रशासकीय मंजूरी प्रदान करण्यात आलेली आहे. तसेच या योजने अंतर्गत मागील वर्षी वितरित केलेल्या अनुदानाचा संपूर्ण रकमेचा विनियोग पूर्ण झाल्याचे अधिक्षक अभियंता, ठाणे (सा. बां.) मंडळ, ठाणे यांनी दिनांक १४/१०/२०१६ च्या पत्रान्वये कळविले आहे व सोबत रुपये १९,२०,००,०००/- (रुपये एकोणीस कोटी वीस लक्ष फक्त ) इतक्या रकमेचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर केले आहे.ही योजना वैयक्तिक लाभार्थ्यांची नाही. या सर्व बाबी लक्षात

घेऊन प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार वरील निधी वितरित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आले असून, त्याचा संकेतांक २०१६१०२७१२१०२५०६१० असा आहे. हे शासन ज्ञापन डिजेटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay Shamkant Degaonkar

Digitally signed by Sanjay Shamkant Degaonkar
DN: c=IN, o=Industry, Energy and Labour Department, ou=Government Of Maharashtra, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=de0a2ca7914a3c02f24aa23655f609f41f2d36b0ec57da4c71f19aaf08230a79, serialNumber=56cf8c8577584adc42f070185c585c41084cc34f6683553d21ccacbfa33d4d1f, cn=Sanjay Shamkant Degaonkar
Date: 2017.01.12 15:06:57 +05'30'

**( संजय देगांवकर )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षण), मुंबई,
२) महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षण), नागपूर,
३) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
४) निवासी लेखा परीक्षण अधिकारी, मुंबई,
५) विकास आयुक्त(उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई-४०० ०३२
६) मुख्य अभियंता, मुंबई (सा.बां.) प्रादेशिक विभाग, मुंबई,
७) सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
८) अधीक्षक अभियंता, ठाणे (सा.बां.) मंडळ, ठाणे, स्टेशन रोड, सार्वजनिक बांधकाम विभाग, ठाणे
९) कार्यकारी अभियंता, जव्हार, सार्वजनिक बांधकाम विभाग, जव्हार जि.पालघर,
१०) वित्त विभाग, (कार्यासन अर्थसंकल्प-१४/व्यय-१६) मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
११) नियोजन विभाग, (कार्यासन-१४६१), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१२) कक्ष अधिकारी(प्रशासन-१), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
१३) निवडनस्ती (उद्योग-२)